# गॅजेट हीरो

लेखिका: लिसा थॉम्पसन

चित्रे: लिसा थॉम्पसन, मॅथ्यू स्टॅपल्टन

# गॅजेट हीरो

मराठी अनुवादः सुशील मेन्सन

## अनुक्रमणिका

"अगं सोफी, ज़रा हे तपासून बघ," ल्यूक म्हणाला. त्याने त्याची घनिष्ठ मैत्रीण सोफी हिला पेनच्या आकाराची एक वस्तू दाखवली. "हे बनवणारा म्हणतो की ही छोटीशी वस्तू पाचशे वेगवेगळी कामे करू शकते. ती झुरळापासून टिनचे डबेसुद्धा कापू शकते. या वस्तुचं नाव आहे, *अमेझ़-ऑल.* आपण बहुधा हेच शोधत होतो."

सोफीने मान डोलावली. "आपण हे नव्हतो शोधत काही."

ल्यूक आणि सोफी गॅजेट जत्रेत होते. ते आपल्या शाळेच्या वृत्तपत्रासाठी एखादी खबर मिळते का, हे शोधत होते. सोफीला त्या नाविन्यपूर्ण गॅजेटबद्दल लिहायची इच्छा नव्हती. तिला काही विशेष वाटणारी खबर हवी होती. ते जत्रेतील अनेक स्टॉलमधून फिरले. पण त्यांना हवी तशी खबर मिळाली नाही.

**नवीन विस्मयकारक गॅजेट, अमेझ ऑल. ते 500 वेगवेगळी कामे करू शकते.**

“चल, आपण वरच्या मजल्यावरचे स्टॉल बघू,” सोफी म्हणाली.

“त्याआधी मला कोल्ड्रिंक प्यावसं वाटतंय,” ल्यूक म्हणाला. त्याला हॉलच्या दुसऱ्या बाजूला एक वेंडिंग मशीन दिसले.

सोफी आणि ल्यूक यांना मशीनजवळ एक बाई दिसली. तिने आपल्या पर्समधून एक स्टिकर काढले आणि ते वेंडिंग मशीनवरील पैशाच्या फटीजवळ चिकटवले.

त्या स्टिकरवर लिहिले होते थँक्स हीरो.

ल्यूक आणि सोफी यांनी इमारतीच्या इतर भागांतही अशी स्टिकर पाहिली होती. प्रवेशद्वाराचे स्वयंचलित दरवाजे आणि प्रतीक्षालयात ठेवलेल्या जेट विमानाच्या प्रतिकृतीवरही असे स्टिकर होते.

ते वेंडिंग मशीनजवळ गेले. ती बाई आपण चिकटवलेले स्टिकर कौतुकाने पाहात उभी होती. सोफीला तिचे कुतूहल लपवता आले नाही. तिने विचारले, “माफ करा. हे स्टिकर कशासाठी लावलंय?”

सोफीच्या प्रश्नाने ती बाई सुखावली. “चला, या स्टिकरने लोकांना विचार करण्यास तरी प्रवृत्त केलं,” बाई उत्तरली. “अनेकांना वाटतं की आपण यंत्रांचा शोध अगदी अलिकडेच लावलाय. पण आपण वापरतो अशा कित्येक यंत्रांचा शोध 2,000 वर्षांपूर्वीच लागला होता. *अलेक्झांड्रियाच्या* प्राचीन ग्रीक हीरोने अशी गॅजेट बनवली होती जी आजही आपण वापरतो.” मग त्या बाई स्टिकरजवळ गेल्या.

“तुम्ही संशोधक आहात का?” ल्यूकने विचारले.

“नाही बरं,” बाई हसत म्हणाली. “माझं नाव *अँजेला रिचर्ड्स*. मी *हीरो समर्थक सोसायटी*ची अध्यक्षा आहे. मला लोकांना जाणीव करून द्यायची आहे की हिरो हा महान संशोधक होता. आज दैनंदिन वापरल्या जाणाऱ्या अनेक वस्तू त्याच्याच कल्पनेतून निर्माण झाल्या आहेत. तो खरंतर आपल्या काळाच्या खूप पुढे होता.” तिने गर्दीकडे पाहिले, “लोकांना हे माहीत असायला हवं.”

**लोकांना वाटतं की यंत्र, गॅजेट यांची निर्मिती आपण अलिकडेच सुरू केली आहे.**

ल्यूकने आपले नाणे वेंडिंग मशीनमध्ये टाकले आणि कोल्ड्रिंक मिळवले.

“पहिल्या वेंडिंग मशीनची निर्मिती हीरोने केली होती,” रिचर्ड्सबाई अभिमानाने म्हणाल्या, जणू काही त्यांनीच त्या मशीनची निर्मिती केली होती.

“दोन हजार वर्षांपूर्वी?” ल्यूकने विचारले.

रिचर्डबाईंनी मान हलवली. “अर्थात, ती या मशीनसारखी वीजेवर चालत नसे. पण हे मशीन त्याच मशीनच्या धर्तीवर चालते.”

ती पुढे बोलू लागली, “हीरोने स्वयंचलित दरवाजे, वाफेवर चालणारे इंजिन, बोलणारे पुतळे, यांत्रिक पक्षी, यंत्रमानव, हवेवर वाजणारे ऑर्गन आणि अशी कित्येक महान साधनं बनवली होती.”

“व्वा!” ल्यूक म्हणाला. सोफी काय प्रतिक्रिया देते हे बघण्यासाठी त्याने तिच्याकडे पाहिले.

सोफी मंद हसली. “आपल्याला आपली खबर मिळाली. रिचर्ड्सबाई, तुम्ही आम्हाला हीरोबद्दल काही सांगाल, जेणेकरून आम्ही आमच्या शाळेच्या वृत्तपत्रासाठी एक लेख लिहू शकू?”

**2,000 वर्षांपूर्वी सर्वात पहिल्या वेंडिंग-मशीनची निर्मिती झाली होती**

"मला खूप आवडतं हीरोबद्दल बोलायला!" रिचर्ड्सबाई म्हणाल्या. "चला, आधी हीरोची सर्वात प्रसिद्ध निर्मिती एयोलिपाइल जाणून घेऊ. एयोलिपाइल म्हणजे विंड बॉल – वाऱ्यावर फिरणारा गोळा. हे यंत्र जेटइंजिनचा पाया आहे. पाचव्या मजल्यावर असं एक यंत्र ठेवलेलं आहे."

रिचर्ड्सबाईंनी तिच्या पिशवीत पाहिले आणि थँक्स हीरोचे काही स्टिकर काढले. त्यातील एक स्टिकर तिने सोफीला दिला.

"तुम्ही वर जाल तेव्हा लिफ्टच्या दारावर हे स्टिकर चिकटवाल का?" रिचर्ड्सबाईंनी विचारले. "मला वाटतं हीरोने बनवलेल्या दरवाजांच्या तुलनेत आजचे स्वयंचलित दरवाजे सुमार आहेत. असो, आणखी काही स्टिकर चिकटवली की माझं काम संपेल. भेटू पुन्हा!" म्हणत आपली स्टिकरची पिशवी सांभाळत ती निघून गेली.

"मला खूप आवडतं हीरोबद्दल बोलायला!"

हीरो समर्थक सोसायटीची सभा पाचव्या मजल्यावर एका मोठ्या खोलीत होती. एका भिंतीवर हीरोच्या शोधनिर्मितीची चित्रे चिकटवली होती. एवढी सारी उपकरणे पाहून ल्यूक आणि सोफी आश्चर्यचकीत झाले. भिंतीवर खेळणी, कारंडी, सर्वेक्षण साधने आणि यंत्रे यांची चित्रे होती. सोबतच गणिताची सूत्रेसुद्धा होती!

"हा विंड बॉल असणार," खोलीच्या एका कोपऱ्यात ठेवलेल्या एका विचित्र साधनाकडे पाहात ल्यूक म्हणाला.

गॅसच्या बर्नरवर पाण्याने भरलेली एक मोठी कढई होती. कढईतून निघालेल्या दोन नळ्या एका पोकळ गोळ्याच्या दोन बाजुंना जोडल्या होत्या. गोळ्याच्या वर आणि खाली इंग्रजी *एल* अक्षराच्या आकाराच्या दोन लहान नळ्या होत्या. सोफीने गोळ्याला स्पर्श केला. तो फिरू शकतो, असे तिला दिसले.

**हीरोचे अद्भूत, अविश्वसनीय शोध साधेसरळ आणि व्यावहारिक होते.**

"सापडलं वाटतं हे तुम्हाला!" रिचर्ड्सबाई घाईघाईत खोलीत शिरत म्हणाल्या. "सुरुवातीला हे खूप काही मोठं आहे असं वाटत नाही, कारण ते साधंसरळ दिसतं. पण हीच तर त्याची खुबी आहे. मी तुम्हाला ते सुरू करून दाखवते. आमच्या प्रत्येक सभेला आम्ही ते सुरू करतो." रिचर्ड्सबाईंनी यंत्रावरील एक तरफ ढकलला. "अर्थात, त्याकाळी पाणी गरम करायला हीरोकडे गॅस बर्नर नव्हता. आपल्याला मात्र लाकडाच्या चुलीपेक्षा गॅस बर्नर सोयीचा आहे."

तिने स्मित केले. "शिवाय हे हीरोच्या यंत्रासारखंच काम करतं."

पाणी गरम झाल्यावर वाफ दोन नळ्यांतून गोळ्यात गेली. ही वाफ गोळ्याच्या एल आकाराच्या नळ्यांतून बाहेर पडली. त्यामुळे गोळा फिरू लागला. पाणी अधिकाधिक गरम होऊ लागले तसे अधिकाधिक वाफ तयार होऊ लागली आणि गोळा अधिकाधिक वेगाने फिरू लागला.

**"विंड-बॉल" आधुनिक इंजिनचा पाया आहे.**

"हे वाफेच्या शक्तीवर चालणारं पहिलं इंजिन होतं!" रिचर्ड्सबाई म्हणाल्या. "जेट इंजिनात आणि बागेतल्या फिरत्या स्प्रिंकलरमध्ये हीच संकल्पना वापरतात. उर्जानिर्मितीची ही सरळसाधी संकल्पना आहे!" तिने आग विझवली.

"याच्यानंतर पहिलं वाफेचं इंजिन बनायला तब्बल 1500 वर्षे लागली, यावर कुणी विश्वास ठेवेल का?" रिचर्ड्सबाईंनी विचारले.

"हीरोने स्वत:च वाफेचे इंजिन का नाही बनवलं?" ल्यूकने विचारले. "आपल्या यंत्राचा वापर कसा करायचा हे त्याला ठाऊक नव्हते का?"

**वाफेच्या आणि जेट इंजिनात तसेच बागेतील स्प्रिंकलरमध्ये हीच संकल्पना वापरतात.**

“प्राचीन काळात वाफेच्या इंजिनाची गरजच नव्हती., कारण तेव्हा गुलाम सगळी कामं करायचे. गरजच नसल्यामुळे कुणी इंजिन विकसितच केलं नाही. त्याकाळी, विंड-बॉल यंत्र हे बिनकामाचं यंत्र होतं. त्यामुळे हिरोचं हे यंत्र शेकडो वर्ष विस्मरणात गेलं,” रिचर्ड्सबाई खिन्न होत म्हणाल्या.

“हीरोची ही संकल्पना काळाच्या बरीच पुढे होती,” नोंदी लिहीत सोफी म्हणाली.

“अगदी बरोबर!” रिचर्ड्सबाईंनी सहमती दर्शवली. “पण हीरोने असेही काही शोध लावले जे पाहून त्याकाळातील लोक आश्चर्याने थक्क झाले. लोकांना बुचकळ्यात पाडणारे आराखडे बनवायला त्याला आवडत असे. मी तुम्हाला त्याचे काही आराखडे दाखवते.”

**वाफेवर फिरणारा गोळा ही संकल्पना काळाच्या खूप पुढे होती.**

रिचर्ड्सबाई त्यांना भिंतीजवळ घेऊन गेल्या. तिने मुलांना एका जुनाट फट यंत्र, एक लहानसं थिएटर व त्याच्या आतील लोकांचे पुतळे आणि स्वयंचलित दरवाजे यांची चित्रे दाखवली.

“हीरो यंत्रं बनवण्यात वाकबगार होता. त्याची यंत्रं गती दिल्यावर आपोआप सुरू होत असत,” ती म्हणाली.

“हीरोची यंत्रं वजन, आग, पाणी आणि वाफ यांचा वापर करत. काही यंत्रं साधीसरळ होती, मंदिरातल्या या फट यंत्रासारखी,” रिचर्ड्सबाईंनी सांगितले.

“हे कसं काम करतं?” ल्यूकने विचारले.

“हीरोच्या अनेक यंत्रांसारखंच यातसुद्धा एक साधीसरळ संतुलित व्यवस्था आहे,” रिचर्ड्सबाई सांगू लागल्या.

**हीरोची यंत्रे एकदा सुरू झाली की आपोआप चालू राहात असत.**

“या यंत्राच्या फटीत नाणं टाकलं की तीर्थ मिळायचं. नाणं आतल्या तबकडीवर पडायचं. ही तबकडी काळजीपूर्वक एका संतुलित तराजुच्या दांडीला लटकत असे. नाण्याच्या वजनामुळे तराजुची एक बाजू खाली जात असे आणि दुसरी बाजू वर जात असे,” रिचर्ड्सबाई म्हणाल्या.

“वर गेलेली बाजू एक व्हॉल्व्ह उघडत असे. त्यातून तीर्थाचं पाणी खाली पडत असे. नाणं तबकडीवरून खाली पडल्यावर तराजुची दांडी पुन्हा संतुलित अवस्थेत येत असे, व्हॉल्व्ह बंद होत असे आणि तीर्थ पडायचे थांबत असे,” रिचर्ड्सबाई म्हणाल्या.

“किती साधंसोप्पंय!” सोफी म्हणाली. रिचर्ड्सबाईंना आणखी बरंच काही सांगायचंय, असं तिला दिसलं.

**तीर्थ देणारे यंत्र हे हीरोचे जगातील पहिलेवहिले वेंडिंग मशीन होते.**

मग रिचर्ड्सबाईंनी एका मंदिराच्या दरवाजाचे चित्र दाखवले. “या स्वयंचलित दाराचा आराखडा तयार केल्यावर हीरो प्राचीन जगातील एक उच्च तंत्रज्ञानाधारीत शोधक बनला. दार उघडल्यावर तात्काळ तुतारी वाजेल, असं तंत्रसुद्धा विकसित केलं!”

“दारावर जगातील पहिली डोअरबेल होती?” सोफीने विनोद केला.

“की पहिलावहिला चोराला पकडणारा गजर होता,” ल्यूकने विचारले.

“कदाचित दोन्ही होते,” रिचर्ड्सबाई स्मित करत म्हणाल्या. “या दरवाजाच्या आराखड्यात हीरोने आग, हवा, पाणी, वजन आणि कप्पी यांचा वापर दाखवला होता.” आराखड्यातील वेगवेगळे भाग दाखवत ती म्हणाली. “पुजारी वेदीमध्ये आग जाळत असे. त्याखाली पाण्याचे एक भांडे असे.”

**हीरोची यंत्रे आग, वजन, पाणी आणि कप्पी यांच्या आधारे काम करत असत.**

रिचर्ड्सबाई पुढे म्हणाल्या, “भांड्यातलं पाणी आगीमुळे गरम होतं. गरम हवा पाण्याला नळकांड्यातून बादलीत ढकलतं. बादली पुरेशी जड झाली की ती साखळ्या खेचून दरवाजा उघडते. अर्थात, लोकांना फक्त आग दिसते आणि थोड्या वेळातच दरवाजा उघडतो, जादू झाल्यागत!”

ल्यूकने बारकाईने भिंतीकडे पाहिले. “या छोट्याशा थिएटरच्या योजनेबद्दलपण सांगा ना थोडंसं?”

रिचर्ड्सबाईंचे डोळे चकाकले. “विलक्षण आहे ते!” एक खराखुरा शो दाखवण्यासाठी हीरोने त्याची शोधनिर्मिती केली होती. दार उघडतं आणि बंद होतं, वेदी उजळून निघतात, आणि दंगा करतात,”ती उद्गारली.

**हीरोच्या शोधांनी सारे थक्क झाले. कित्येकांना वाटले की त्याची यंत्रे जादूवर चालतात.**

रिचर्ड्सबाई म्हणाल्या, “हे यंत्र पूर्णपणे गुरुत्वाकर्षण, वजन, दोर, चाकं आणि वाळूवर चालतं.”

“हीरोच्या डोक्यात अशा भन्नाट कल्पना आल्या कुठून? त्याने आपल्या कल्पनांची चाचणी कुठे केली?” ल्यूकने विचारले.

“हीरो अलेक्झांड्रिया नावाच्या शहरात राहात होता. त्याकाळी हे शहर म्हणजे वैविध्यपूर्ण कल्पनांची खाण होती.” रिचर्ड्सबाईंनी टेबलमधील एक लांबट, मोठा खण उघडला. “मी तुम्हाला प्राचीन अलेक्झांड्रियातील कलाकारांनी बनवलेली चित्रं दाखवते. म्हणजे ते शहर कसं होतं ते तुमच्या लक्षात येईल,” त्या म्हणाल्या.

**हीरो, ई.स. पहिल्या शतकात अलेक्झांड्रिया नावाच्या कल्पनांनी समृद्ध असलेल्या शहरात राहात होता.**

"दोन हजार वर्षांपूर्वी," रिचर्ड्सबाई एका जुन्या नकाशाकडे लक्ष वेधत बोलू लागल्या, “अलेक्झांड्रिया हे इजिप्त देशाच्या समुद्रकिनारी वसलेले एक भव्य मोठे शहर होते. असंख्य लोक व्यापार करण्यासाठी तिथे येत. हे शहर संशोधक, तत्वज्ज्ञ आणि नवनिर्मिती करणाऱ्या लोकांना आकर्षित करत असे.”

त्या पुढे बोलू लागल्या, “अलेक्झांड्रियामध्ये एक ग्रंथालय आणि वस्तुसंग्रहालय होते. वस्तुसंग्रहालयात अनेक विषयांचे वर्ग भरत. विविध विषयांत रस असलेले लोक तिथे एकत्र येत आणि आपल्या विचारांचे आदान-प्रदान करत.”

**इजिप्तच्या समुद्रकिनारी वसलेले अलेक्झांड्रिया हे अत्यंत व्यस्त ग्रीक शहर होते.**

"हीरो वस्तुसंग्रहालयाचा सदस्य होता का?" सोफीने विचारले.

"होय. हीरो फक्त संशोधक नव्हता. तो गणित आणि विज्ञान शिकवतसुद्धा असे."

"म्हणजे पहिल्या शतकातसुद्धा लोकांना गृहपाठ करावा लागे!" ल्यूक हसू लागला.

"गणित, विज्ञान शिकवत असल्यामुळे हीरोला नवीन कल्पना सुचायच्या का?" सोफीने विचारले.

"नक्कीच तसं असावं! हीरो विविध क्षेत्रांतल्या तज्ज्ञांसोबत काम करत असे. तो त्याच्या कल्पना त्यांना सांगत असे. त्यातील शंका-प्रश्न सोडवण्यास ते तज्ज्ञ त्याला मदत करत असत," रिचर्ड्सबाई म्हणाल्या. "पण त्याने फक्त वस्तुसंग्रहालयातच आपल्या कल्पनांवर चर्चा केली नाही. त्याने त्याच्या कल्पनांचा अंतर्भाव असलेली पुस्तकंही लिहिली. एका पुस्तकात त्याने महान शोधक कसे बनायचे, याबाबत सल्ले दिले.

**कित्येक महान तत्वज्ञ आपले विचार मांडायला अलेक्झांड्रियात जमत.**

रिचर्ड्सबाई पुढे बोलू लागल्या, “हीरो म्हणतो की शोधकांनी वस्तुंकडे निराळ्या दृष्टिने पाहिलं पाहिजे. त्यांनी प्रयोग, नोंदी केल्या पाहिजेत, प्रतिकृती बनवल्या पाहिजेत, सिद्धांतांवर चर्चा केली पाहिजे, कल्पनांचे आदान-प्रदान आणि तुलना केली पाहिजे. काहीवेळा हीरोने विंड-बॉलसारख्या प्रतिकृती बनवल्या कारण त्या कल्पना त्याला खूप भावल्या. हीरोकडे एका शोधकाला आवश्यक असलेली कुतूहल ही उत्तम भेट होती.”

“त्या ग्रंथालयाचं, पुस्तकांचं काय झालं?” ल्यूकने विचारले.

**अलेक्झांड्रियाचे ग्रंथालय आणि वस्तुसंग्रहालय प्राचीन जगातील पुस्तकांचे मोठे भांडार होते.**

“युद्धादरम्यान ग्रंथालय आणि वस्तुसंग्रहालय बेचिराख झाले. हीरोचे बरेचसे लिखाण आणि शोधांच्या नोंदी तब्बल दीड हजार वर्षे अज्ञात राहिले,” रिचर्ड्सबाई म्हणाल्या.

“पण त्याच्या कल्पना जिवंत राहिल्या आणि आज आपण त्या वापरतो,” सोफी म्हणाली.

“पण त्याचं लिखाण, नोंदी हरवल्याच नसत्या तर!” ल्यूक म्हणाला.

“हो,” रिचर्ड्सबाई मान डोलवत म्हणाल्या. “मग आतापर्यंत कितीतरी आणखी नवनवे शोध लागले असते.”

## शाळेच्या वृत्तपत्रात हीरोचे नाव

शाळेच्या वृत्तपत्राचा पुढला अंक येईपर्यंत शाळेत सर्वत्र *थँक्स हीरो* लिहिलेले स्टिकर दिसू लागले. स्वयंचलित दरवाजे, कारंजी आणि वेंडिंग यंत्रांवरही स्टिकर होते. ग्रंथालयात वाफेवर चालणारी ट्रेन आणि जेट इंजिन यांच्या पुस्तकांवरही ही स्टिकर दिसू लागली.

ल्यूक, सोफी आणि वृत्तपत्राचा संपादक वगळता, *थँक्स हीरो* हे काय आहे, याची कुणालाच कल्पना नव्हती. हीरो कोण, याचे सर्वांना कुतूहल होते. पुढचे स्टिकर कुठे लावले जाईल, याबद्दल लोक तर्क करू लागले.

या रहस्यात भर म्हणून शाळेच्या ग्रंथालयात *विंड-बॉल*ची प्रतिकृती ठेवण्यात आली. रिचर्ड्सबाई आणि हीरो समर्थक सोसायटी यांनी ही प्रतिकृती शाळेच्या प्रदर्शनात मांडण्यासाठी दिली होती.

**थँक्स-हीरो, थँक्स-हीरो, थँक्स-हीरो, थँक्स-हीरो**

ग्रंथपालांनी एक स्पर्धा भरवली. तिने विद्यार्थ्यांना *विंड-बॉल*च्या उद्देशाबद्दल तर्क करण्यास सांगितले. कुणीही अंदाज लावू शकले नाही की ते वाफेवर चालणारे पहिलेवहिले इंजिन होते.

शेवटी तो दिवस उगवला जेव्हा रहस्याचा उलगडा झाला. वृत्तपत्राच्या सर्व प्रती लोकांनी घाईघाईत विकत घेतल्या. कारण हीरो कोण होता, ग्रंथालयात ठेवलेले त्याचे नवलाईचे यंत्र काय करते याचे कुतूहल सर्वांनाच होते.

ल्यूक आणि सोफी यांनी रिचर्ड्सबाईंना वृत्तपत्राची एक प्रत दिली, तेव्हा त्या रोमांचित झाल्या.

वृत्तपत्राच्या पानावरील मथळा होता:

छुपा रुस्तम हीरो!

भेटा त्या शोधकाला ज्याच्या कल्पना सर्वत्र आहेत.

"उत्तम झालाय तुमचा लेख!" रिचर्ड्सबाई म्हणाल्या. "जो कुणी तो वाचेल त्याला कळेल की हीरो हा एक महान शोधक होता. आज आपण वापरतो त्या बऱ्याच वस्तू त्याच्याच कल्पनांचा परिपाक आहेत!"

**ते काय आहे? काही अंदाज? ते जगातील पहिवेवहिले वाफेवर चालणारे इंजिन आहे!**

“हीरो समर्थक सोसायटीची अध्यक्षा म्हणून मी तुम्हा दोघांना आमच्या क्लबचे सदस्य बनवते,” रीचर्ड्सबाईंनी जाहीर केले. “तुम्ही आपल्या कल्पना आमच्यापुढे मांडू शकता, इतर शोधकांसोबत प्रयोग करू शकता, हीरोने केलं होतं तसं. तुम्ही कदाचित नवी शोधनिर्मिती करू शकता आणि भविष्य घडवू शकता. तुमचे शोध पुढची हजार वर्षं लोकांच्या उपयोगी पडतील – अगदी हीरोच्या शोधांसारखंच!”

“मला आवडेल असं करायला!” सोफी हसत म्हणाली. “तुला काय वाटतं, ल्यूक?”

“होय, मला वाटतं की मीसुद्धा एखादा नवा शोध लावीन,” तो हसत बोलू लागला. “आणि एक दिवस *ल्यूक समर्थक सोसायटी* स्थापन होईल. किती रोमांचक वाटतं हे!”

**“अभिनंदन! तुम्ही दोघे हीरो समर्थक सोसायटीचे अधिकृत सदस्य झालात.”**

## वेंडिंग-मशीन, सर्वत्र

हीरोने तीर्थ देणारे यंत्र तयार केले तेव्हा त्याला कल्पना नव्हती की भविष्यात हे यंत्र वस्तुंची विक्री करणारे सोयीस्कर आणि लोकप्रिय साधन ठरेल. अनेक वस्तुंसोबत आज आपण वेंडिंग मशीनमधून ताजे अन्न, मबाईल फोन आणि जिवंत गांडूळसुद्धा विकत घेऊ शकतो.

underwear, pajamas, dried squid, fresh steaks, tickets, herbal remedies, pearl necklaces, books, soft drinks tea, coffee, bags of rice, batteries, jeans, eggs, otebooks, bread, newspapers, videotapes, live shrimp, andwiches,

rogs, fresh fish, worms, suckers, fortune cookies, fortune-telling cards, temporary tattoos, beef jerky, comic books, business cards, stuffed animals, watches, cameras, envelopes, stamps, flower arrangements, badges, shavers, calculators, coffee, cans, panty hose, poetry, b chips, ink, gas,

समाप्त